राज्य उत्पादन शुल्क विभागातील लिपिक संवर्गातील कर्मचाऱ्यांना 'दुय्यम निरीक्षक' (गट-क) पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी व विभागीय मर्यादित स्पर्धा परीक्षेव्दारा नियुक्तीसाठी स्पर्धा परीक्षेचे स्वरूप व अभ्यासक्रम.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन शुध्दीपत्रक क्र.एमआयएस २००९/प्र.क्र.२६५/इएक्ससी-४,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक :२७ जुलै, २०१०.

**वाचा :** **१**. शासन निर्णय, गृह विभाग समक्रमांक, दि. १७/१२/२००९.
**२**.आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र - क्र.इएसटी ११२००४/६/२-क दि.८/४/२०१०,२७/४/२०१० व ५/५/२०१०.

**शुध्दीपत्रक** :- संदर्भाधीन क्र. १ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र 'अ' व 'ब' मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत तसेच त्यानुसार सुधारीत विवरणपत्र 'अ' व 'ब' च्या प्रतीही सोबत जोडण्यात येत आहेतः-

| अ. क्र. | परिच्छेद क्रमांक | सध्याची तरतूद (सदर तरतूदीच्या ऐवजी) | बदलानंतरची तरतूद (अशी तरतूद वाचावी.) |
|---|---|---|---|
| **१** | विवरणपत्र 'अ' (१) (तीन) | शारिरीक चाचणी- २०० गुण | या शब्दांसमोर ' ही चाचणी किमान पात्रतेसाठी घेण्यात येईल व एकूण गुणानुक्रम ठरविताना यामध्ये मिळविलेल्या गुणांचा विचार करण्यात येणार नाही ' असे वाचावे. |
| **२** | विवरणपत्र 'अ'-(१) (चार) | मुलाखत -७५ गुण | मुलाखत -५० गुण |
| **३** | विवरणपत्र 'अ'-(७ ) (दोन) दुसरी ओळ ते चौथी ओळ | 'त्यावेळी उमेदवाराने पोष्टाच्या कार्यालयातून नव्याने माहिती पुस्तिकेसह अर्ज खरेदी करणे व अर्ज परिपूर्ण भरून आवश्यक कागदपत्रे परीक्षा शुल्क, छायाचित्र इत्यादीसह विहीत केलेल्या कालावधीत पोस्टाच्या कार्यालयात सादर करणे आवश्यक राहील त्याशिवाय उमेदवारास मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र समजण्यात येणार नाही ' | 'त्यावेळी उमेदवाराने नव्याने माहितीपुस्तिकेसह अर्ज खरेदी करणे व अर्ज परिपूर्ण भरून आवश्यक कागदपत्रे, परीक्षा शुल्क, छायाचित्र इत्यादीसह विहीत केलेल्या कालावधीत आयुक्तांनी निर्देशित केलेल्या पध्दतीनुसार व निर्देशित केलेल्या कार्यालयास सादर करणे आवश्यक राहील. त्याशिवाय उमेदवारास मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र समजण्यात येणार नाही .अर्ज प्राप्त होण्याचे ठिकाण उमेदवारांना कळविण्यात येईल'. |
| **४** | विवरणपत्र 'अ'-(१३) तिसरी ओळ | 'मुलाखत ७५ गुणांची असेलं' | 'मुलाखत ५० गुणांची असेलं' |
| **५** | विवरणपत्र 'अ'-(१४) पहिली ओळ | लेखी परीक्षा, चाचणी आणि मुलाखतीमध्ये प्राप्त केलेल्या गुणांची बेरीज करून गुणवत्ताक्रमानुसार यादी तयार करण्यात येईल. | लेखी परीक्षाआणि मुलाखतीमध्ये प्राप्त केलेल्या गुणांची बेरीज करून गुणवत्ताक्रमानुसार यादी तयार करण्यात येईल. |
| **६** | विवरणपत्र 'ब-५-५.१ मधील २ | परीक्षेचे टप्पे :- तीन -१) लेखी परीक्षा २)शारीरिक चाचणी ३)मौखिक व व्यक्तिमत्त्व चाचणी | परीक्षेचे टप्पे :- दोन-१) लेखी परीक्षा २)मौखिक व व्यक्तिमत्त्व चाचणी. |

| | | | |
|---|---|---|---|
| ७ | विवरणपत्र 'ब'-५-५.२ परीक्षेचे स्वरूप मधील १) व तक्यातील ओळ क्र.२ पहिला व तिसरा रकाना | 'लेखी परीक्षा २०० गुण - लेखी परीक्षेसाठी खाली नमूद करण्यात आल्याप्रमाणे पारंपारिक स्वरूपाच्या दोन प्रश्नपत्रिका असतील.प्रश्नपत्रिका २ ही मराठी व इंग्रजी भाषेतून असेल ' तसेच 'इंग्रजी-५० गुण ' 'दोन तास' तक्त्यातील ओळ क्र.२ पहिला रकाना 'इंग्रजी -५० गुण' तक्त्यातील ओळ क्र.२ तिसरा रकाना 'दोन तास' | 'लेखी परीक्षा-३०० गुण,लेखी परीक्षा एकूण ३०० गुणांची असेल या परीक्षेसाठी दोन अनिवार्य प्रश्नपत्रिका असतील.त्यापैकी प्रश्नपत्रिका क्र.१ मधील मराठी,इंग्रजी व महाराष्ट्र नागरी सेवा नियम (वर्तणूक व सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) या विभागावर वस्तुनिष्ठ बहुपर्यायी व वर्णनात्मक स्वरूपाचे प्रश्न विचारण्यात येतील व सामान्य ज्ञान या विभागावर वस्तुनिष्ठ स्वरूपाचे प्रश्न विचारण्यात येतील. प्रश्नपत्रिका क्र.२ इंग्रजी व मराठी भाषेतून असेल व ही प्रश्नपत्रिका पारंपारिक स्वरूपाची असेल' तक्त्यातील ओळ क्र.२ पहिला रकाना 'इंग्रजी-३० गुण',महाराष्ट्र नागरी सेवा नियम (वर्तणूक व सेवेच्या सर्वधारण शर्ती)-२० गुण ' तक्त्यातील ओळ क्र.२ तिसरा रकाना 'तीन तास' |
| ८ | विवरणपत्र 'ब' ५.३-प्रश्नपत्रिका-१ खालील पहिली ओळ | 'मराठी,इंग्रजी (गुण १०० ) प्रत्येकी ५० गुण ' | 'मराठी ५० गुण ,इंग्रजी ३० गुण,महाराष्ट्र नागरी सेवा नियम (वर्तणूक व सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) २० गुण ' |
| ९ | विवरणपत्र 'ब'-५.३-शारीरिक चाचणीशी संबंधित परिच्छेद | शारीरिक चाचणीशी संबंधित पूर्ण परिच्छेद | शारीरिक चाचणीशी संबंधित पूर्ण परिच्छेद वगळण्यात आला आहे. |
| १० | विवरणपत्र 'ब'-५.४- पहिली व दुसरी ओळ | 'शारीरिक चाचणी उत्तीर्ण होणाऱ्या उमेदवारांची मौखिक व व्यक्तिमत्त्व चाचणी घेण्यात येईल.सदर चाचणी ५० गुणांची असेल' | 'मौखिक व व्यक्तिमत्त्व चाचणी ५० गुणाची असेल' |
| ११ | विवरणपत्र 'ब' - ५.५ (अ) मधील पहिली ओळ | 'शारीरिक चाचणी' | 'शारीरिक चाचणी' हा शब्द वगळण्यात आला आहे. |
| १२ | विवरणपत्र 'ब' - ५.५ (अ) मधील दुसरी ओळ | 'तिन्ही' | 'दोन्ही' |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००८०३१८१५४०००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( प्र.ता.गौड )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

- आयुक्त,राज्य उत्पादन शुल्क ,महाराष्ट्र राज्य,मुंबई,
- सर्व विभागीय उपआयुक्त,राज्य उत्पादन शुल्क विभाग/सर्व अधीक्षक,राज्य उत्पादन शुल्क विभाग,
- सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२, कार्यासन-१४अ/संगणक समन्वय शाखा,
- गृह विभाग, निवडनस्ती (इएक्ससी-४).

(शासन शुध्दीपत्रक, गृह विभाग क्र. इएसटी-२७०९/प्र.क्र.२६५/का.इएक्ससी-४, मंत्रालय, मुंबई-३२, दिनांक २७ जुलै, २०१० सोबतचे विवरणपत्र-"अ")

**"विवरणपत्र-अ"**

**नामनिर्देशनाने दुय्यम निरीक्षक, राज्य उत्पादन शुल्क पदावर नियुक्तीसाठी परीक्षा.**

**आयुक्तांनी किंवा शासनाने नियुक्त केलेल्या राज्यस्तरीय निवडसमितीने किंवा अन्य कोणत्याही शासकीय अभिकरणाने घेतलेल्या स्पर्धा परीक्षेच्या निकालाच्या आधारे नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात येईल.**

**(१) परिक्षेचे टप्पे-**

प्रस्तुत परिक्षा खालील टप्प्यात एकत्रितरित्या घेण्यात येईल.

(एक) पूर्व परीक्षा- ३०० गुण.

(दोन) मुख्य परीक्षा- ४०० गुण.

(तीन) शारीरिक चाचणी- २०० गुण.(ही चाचणी किमान पात्रतेसाठी घेण्यात येईल व एकूण गुणानुक्रम ठरविताना यामध्ये मिळविलेल्या गुणांचा विचार करण्यात येणार नाही.)

(चार) मुलाखत- ५० गुण.

१.१ पूर्व परीक्षेकरिता विहित केलेल्या किमान सीमारेषा किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळविणा-या उमेदवारांस मुख्य परीक्षेकरिता प्रवेश देण्यात येईल. मुख्य परीक्षेकरिता उमेदवारांची संख्या मर्यादित करण्याच्या दृष्टीने पूर्व परीक्षा घेण्यात येईल. यामुळे पूर्व परीक्षेचे गुण अंतिम निवडीच्या वेळी विचारात घेतले जाणार नाहीत. तसेच, सदर पूर्व परीक्षा ही चाचणी परीक्षा असल्याने त्याचे गुण उमेदवारांना कळविले जाणार नाहीत. पदसंख्या व त्याकरिता प्राप्त होणा-या अर्जांची संख्या लक्षात घेऊन पूर्व परीक्षा होणे किंवा न होणे याचा निर्णय आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई घेऊ शकतात.

१.२ दुय्यम निरीक्षक पदासाठी मुख्य परीक्षेकरिता विहीत केलेल्या सीमारेषा किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळविणा-या उमेदवारांना शारीरिक चाचणीसाठी पात्र ठरविण्यात येईल व शारीरिक चाचणीमध्ये किमान १०० गुण मिळविणा-या उमेदवारांना मुलाखतीसाठी पात्र ठरविण्यात येईल.

१.३ जाहिरातीतील तरतुदीनुसार विहित अटींची पूर्तता करणा-या व मुलाखतीच्या वेळी सर्व मुळ कागदपत्रे सादर करणा-या उमेदवारांची मुलाखत घेण्यात येईल.

**(२) अर्हता:-**

२.१. प्रस्तुत परीक्षेच्या अंतिम निकालाच्या आधारे शिफारस झालेल्या उमेदवारांची नियुक्ती करण्यापूर्वी त्यांची शारीरिक मोजमापे आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क , मुंबई यांच्यामार्फत सक्षम प्राधिका-याकडून तपासून घेण्यात येतील. वरील प्रमाणे शारीरिक क्षमता न भरल्यास संबंधित उमेदवार अपात्र ठरेल व त्याची शिफारस केली जाणार नाही.

**(३) पूर्व परीक्षा:-**

**३.१. परीक्षा योजना:**

(एक) प्रश्नपत्रिका:- एक

(दोन) परीक्षेचे स्वरुप:- वस्तुनिष्ठ बहुपर्यायी.

(तीन) प्रश्नांची संख्या:- १५०

(चार) एकूण गुण:- ३००

(पाच) परीक्षेचा कालावधी:- दीड तास

(सहा) परीक्षेचे मानक (दर्जा):- शालांत

(सात) परीक्षेचे माध्यम:- मराठी व इंग्रजी.

(४) **अभ्यासक्रम**

सामान्य क्षमता (विशेष संकेतांक-०१२) या विषयामध्ये खालील घटक/उपघटकांचा समावेश असणार.

(१) अंकगणित: बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, सरासरी, दशांश अपूर्णांक

(२) भूगोल (महाराष्ट्राच्या भूगोलाच्या विशेष अभ्यासासह)- पृथ्वी, जगातील विभाग, महाराष्ट्रातील जमिनीचे प्रकार, पर्जन्यमान, प्रमुख पिके, शहर, नद्या, उद्योगधंदे.

(३) भारताचा सामान्य इतिहास- सन १८५७ ते १९४७.

(४) नागरिकशास्त्र आणि अर्थव्यवस्था- भारताच्या घटनेचा प्राथमिक अभ्यास.

(५) **पूर्व परीक्षेचा निकाल:-**

(एक) भरावयाच्या एकूण पदांपैकी प्रत्येक आरक्षित प्रवर्ग/उपप्रवर्गासाठी १२ ते १३ पट उमेदवार उपलब्ध होतील अशा रितीने गुणांची किमान सीमारेषा (Cut Off Line) निश्चित करण्यात येईल. सदर सीमारेषा सर्व उमेदवारांसाठी एकच किंवा प्रत्येक सामाजिक प्रवर्ग/उपप्रवर्गासाठी तसेच महिला, अपंग, खेळाडू इत्यादींसाठी वेगवेगळी असेल.

(दोन) प्रत्येक प्रवर्ग/उपप्रवर्गासाठी निश्चित केलेल्या सीमारेषा किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळविणा-या उमेदवारांना त्यांनी पूर्व परीक्षेच्या अर्जामध्ये दिलेल्या माहितीच्या आधारे, ते विहित अटींची पूर्तता करतात असे समजून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र समजण्यात येईल.

(तीन) अशा रितीने मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांची यादी आयुक्त कार्यालयाच्या सूचना फलकावर प्रसिध्द करण्यात येईल.

(चार) मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांचा निकाल जाहीर झाल्याची बातमी राज्यातील प्रमुख वृत्तपत्रांतून प्रसिध्द करण्यात येईल. तसेच मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या प्रत्येक उमेदवाराला वैयक्तिकरित्या कळविण्यात येईल.

(पाच) पूर्व परीक्षा ही मुख्य परीक्षेच्या प्रवेशाकरिता उमेदवारांची संख्या मर्यादित करण्याच्या दृष्टीने घेण्यात येणारी चाळणी परीक्षा असल्याने मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र न ठरलेल्या उमेदवारांच्या उत्तरपत्रिकांची फेरतपासणी केली जात नाही अथवा या संदर्भातील कोणत्याही प्रकारच्या अभिवेदनावर कार्यवाही केली जात नाही.

(सहा) पदसंख्या व आरक्षण शासनाने कळविल्यानुसार राहील व विज्ञापनेत प्रसिध्द केले जाईल.

(६) **मुख्य परीक्षा**

**६.१. परीक्षेचे टप्पे:-**

दुय्यम निरीक्षक:- लेखी परीक्षा, शारीरिक चाचणी, मुलाखत

(७) **परीक्षेस प्रवेश:-**

(एक) पूर्व परीक्षेमध्ये अर्हताप्राप्त होणा-या आणि आवश्यक शैक्षणिक अर्हता व अन्य अटींची पूर्तता करणा-या उमेदवारास मुख्य परीक्षेकरिता प्रवेश दिला जाईल.

(दोन) मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांना वैयक्तिकरित्या पत्राद्धारे कळविण्यात येईल. त्यावेळी उमेदवाराने नव्याने माहितीपुस्तिकेसह अर्ज खरेदी करणे व अर्ज परिपूर्ण भरुन आवश्यक कागदपत्रे,परीक्षा शुल्क,छायाचित्र इत्यादीसह विहीत केलेल्या कालावधीत आयुक्तांनी निर्देशित केलेल्या पध्दतीनुसार व निर्देशित केलेल्या कार्यालयास सादर करणे आवश्यक राहील. त्याशिवाय उमेदवारास मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र समजण्यात येणार नाही.अर्ज प्राप्त होण्याचे ठिकाण उमेदवारांना कळविण्यात येईल.

(तीन) पूर्व परीक्षेच्या अर्जामध्ये नमुद केलेली जातीविषयक वर्गवारी, क्रिमिलेअर तसेच अपंग, खेळाडू इत्यादी विषयक दाव्यामध्ये फेरबदल करता येणार नाही.

(चार) पूर्व परीक्षेचा अर्ज करताना जातीचे, क्रिमिलेअर अथवा अपंगत्वाचे प्रमाणपत्र उपलब्ध नसल्याने केवळ अराखीव पदासाठी अर्ज केलेल्या उमेदवाराने मुख्य परीक्षेच्या वेळी आरक्षित पदासाठी दावा केल्यास तो कोणत्याही परिस्थितीत स्विकारला जाणार नाही. तसेच वर्गवारीचा दावा बदलत आहे ही उमेदवाराची सबब मान्य केली जाणार नाही.

(पाच) पूर्व परीक्षेच्या अर्जातील व मुख्य परीक्षेच्या अर्जातील कोणत्याही माहितीमध्ये तफावत आढळून आल्यास अशा उमेदवारांची उमेदवारी कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल.

**(८) परीक्षा योजना**

(एक) प्रश्नपत्रिकेचे स्वरुप :- वस्तुनिष्ठ बहुपर्यायी

(दोन) एकूण गुण: ४००

(तीन) प्रश्नपत्रिकांची संख्या:- दोन, प्रत्येक प्रश्नपत्रिकेचा तपशिल खालील प्रमाणे.

| पेपर क्रमांक व संकेतांक | विषय | गुण | दर्जा | माध्यम | वेळ |
|---|---|---|---|---|---|
| १ (संकेतांक ०६) | मराठी व | १३० | मराठी-बारावी | मराठी | दोन तास |
| | इंग्रजी | ७० | इंग्रजी पदवी | इंग्रजी | |
| २ (संकतांक ०५) | सामान्य ज्ञान व | १३० | पदवी | इंग्रजी व मराठी | दोन तास |
| | बुध्दीमापन | ७० | | | |

**(९) अभ्यासक्रम**

(एक) पेपर क्रमांक १- इंग्रजी व मराठी- सर्वसामान्य शब्दसंग्रह, वाक्यरचना, व्याकरण, म्हणी व वाक्यप्रचार यांचा अर्थ आणि उपयोग, तसेच उता-यांवरील प्रश्नांची उत्तरे.

(दोन) पेपर क्रमांक २- सामान्य ज्ञान व बुध्दीमापन- या विषयामध्ये खालील घटक/उपघटकांचा समावेश असेल:-

**(अ) सामान्य ज्ञान -**

(१) कला शाखा-आधुनिक भारताचा इतिहास, भारताचा विशेषत: महाराष्ट्राचा भूगोल, ग्राम प्रशासन.

(२) विज्ञान शाखा- प्राथमिक सांख्यिकी आधारसामग्रीचे पृथ:करण, जागतिक तसेच भारतातील वैज्ञानिक व अभियांत्रिकी प्रगती, वैज्ञानिक प्रगतीमुळे शहरी तसेच ग्रामीण जीवनावर झालेला परिणाम.

(३) वाणिज्य व अर्थशास्त्र शाखा-

(३.१) भारतीय अर्थव्यवस्था- राष्ट्रीय उत्पन्न, शेती, उद्योग, परकीय व्यापार, बॅकींग, लोकसंख्या, दारिद्रय व बेरोजगारी, मुद्रा आणि राजकोषीय नीती इत्यादी.

(३.२) पंचवार्षिक योजना- भारताच्या विशेषत: महाराष्ट्राच्या.

(३.३) शासकीय अर्थव्यवस्था- अर्थसंकल्प, लेखा, लेखापरीक्षण, इत्यादी.

(४) कृषि शाखा: जमिनीचा वापर, प्रमुख पिके, जलसिंचन, पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय, फलोत्पादन, वनविकास, मस्यव्यवसाय, कृषि अर्थशास्त्र.

(५) जागतिक तसेच भारतातील चालू घडामोडी- राजकीय, औद्योगिक, आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक, भौगोलिक, खगोलशास्त्रीय, सांस्कृतिक, वैज्ञानिक, इत्यादी.

(ब) बुध्दिमापन विषयक प्रश्न- उमेदवार किती लवकर व अचूकपणे विचार करु शकतो याचा अंदाज घेण्याच्या दृष्टीने सदर प्रश्न विचारण्यात येतील.

**(१०) परीक्षा केंद्र:**

(एक) विज्ञापनेत नमुद केलेल्या ठिकाणी सदर परीक्षा घेण्यात येईल.

(दोन) अर्जातील दाव्यानुसार व उपलब्धतेनुसार जिल्हा केंद्रावरील विविध उपकेंद्रावर पात्र उमेदवारांना प्रवेश देण्यात येईल.

**(११) लेखी परीक्षेचा निकाल:-**

(एक) दुय्यम निरीक्षक पदासाठी भरावयाच्या एकूण पदांपैकी प्रत्येक आरक्षित प्रवर्ग/उपप्रवर्गासाठी ४ पट उमेदवार शारीरिक चाचणीसाठी उपलब्ध होतील, अशा रितीने गुणांची किमान सीमारेषा (Cut Off Line) निश्चित करण्यात येईल. सदर सीमारेषा सर्व उमेदवारांसाठी एकच किंवा प्रत्येक सामाजिक प्रवर्ग/उपप्रवर्गासाठी तसेच महिला, खेळाडू इत्यादींसाठी वेगवेगळी असेल.

(दोन) प्रत्येक प्रवर्ग/उपप्रवर्गासाठी निश्चित केलेल्या सीमारेषा किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळविणा-या या उमेदवारांना त्यांनी मुख्य परीक्षेच्या अर्जामध्ये दिलेल्या माहितीच्या आधारे, ते विहित अटींची पूर्तता करतात असे समजून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात मुलाखतीसाठी पात्र समजण्यात येईल.

(तीन) लेखी परीक्षेचा निकाल जाहीर झाल्याची बातमी राज्यातील प्रमुख वृत्तपत्रांतून प्रसिध्द करण्यात येईल. तसेच शारीरिक चाचणी आणि मुलाखतीसाठी पात्र ठरलेल्या प्रत्येक उमेदवाराला वैयक्तिकरित्या कळविण्यात येईल.

(चार) अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती तसेच उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याचे प्रमाणपत्र असलेल्या विमुक्त जाती (अ), भटक्या जमाती (ब), विशेष मागास प्रवर्ग, भटक्या जमाती (क), भटक्या जमाती (ड) व इतर मागास वर्ग या प्रवर्गातील उमेदवार तसेच अपंग व महिला उमेदवार लेखी परीक्षेत केवळ त्यांच्यासाठी विहित केलेल्या निम्न सीमारेषेनुसार अर्हताप्राप्त झाल्यास अंतिम शिफारशीच्या वेळी त्यांची उमेदवारी सर्वसाधारण (अमागास) पदासाठी विचारात घेतली जाणार नाही.

**(१२) शारीरिक चाचणी- एकूण २०० गुण.**

(एक) जे उमेदवार लेखी परीक्षेत निश्चित केलेल्या सीमांकन रेषेएवढे किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळवतील, फक्त अशाच उमेदवारास शारीरिक चाचणीकरिता बोलाविण्यात येईल. अशा उमेदवारांना शारीरिक चाचणीसाठी आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई यांनी विहित केलेल्या दिनांकास व ठिकाणी उमेदवाराला स्वखर्चाने उपस्थित रहावे लागेल.

(दोन) उंची व छाती विषयक मोजमापाच्या अटी पूर्ण करणा-या उमेदवारांचीच शारीरिक चाचणी घेण्यात येईल. सदर चाचणी पुरुष व महिलांसाठी स्वतंत्र असेल.

(तीन) **शारीरिक चाचणीचा तपशिल:**

| **पुरुषांसाठी** | **महिलांसाठी** |
|---|---|
| (१) गोळाफेक वजन ७.२६० कि.ग्रॅ.कमाल गुण ३० | (१) गोळाफेक वजन ४ कि.ग्रॅ.कमाल गुण ४० |
| (२) पुलअप्स- कमाल गुण ४० | (२) धावणे (२०० मिटर्स) कमाल गुण ८० |
| (३) लांब उडी- कमाल गुण ३० | (३) चालणे (३ कि.मी.) कमाल गुण ८० |
| (४) धावणे (८०० मिटर्स) कमाल गुण १०० | |

(चार) शारीरिक चाचणीच्या वेळी सेवाप्रवेश नियमांतर्गत तरतुदीनुसार उंची व छाती विषयक विहित मोजमापाच्या अटी पूर्ण न करणा-या उमेदवारांची उंची/छाती मापनाविषयी काही तक्रार असल्यास त्यांनी त्याच दिवशी आयुक्त कार्यालयाकडे तक्रार अर्ज सादर करणे आवश्यक आहे. याबाबत योग्य

तो विचारविनिमय करुन अपात्र उमेदवारांच्या उंची/छातीचे फेरमापन घेण्याकरिता उमेदवारांना स्वतंत्रपणे कळविण्यात येईल. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क कार्यालयाने निश्चित केलेल्या वेळापत्रकानुसार अशा उमेदवारांच्या उंची व छाती विषयक फेरमोजमापनाकरिता दिनांक, वेळ व ठिकाण निश्चित करण्यात येईल. फेरमापनाच्या अनुषंगाने पात्र ठरणा-या उमेदवारांची शारीरिक चाचणी त्याच दिवशी घेण्यात येईल. तसेच शारीरिक चाचणीत पात्र ठरणा-या उमेदवारांना मुलाखतीकरिता स्वतंत्रपणे कळविण्यात येईल.

(पाच) शारीरिक चाचणीच्या सरावासाठी उमेदवार राज्यातील पोलीस कवायत मैदानांचा उपयोग करु शकतील आणि पोलीस मुख्यालयातील पोलीस उपायुक्तांच्या तसेच पोलीस अधीक्षकांच्या परवानगीने निर्देशकांची मदत घेऊ शकतील.

(सहा) शारीरिक चाचणीमध्ये किमान १०० गुण मिळविणा-या उमेदवारांची मुलाखत निर्धारित केलेल्या दिनांकास व ठिकाणी घेण्यात येईल. त्याकरिता उमेदवारास स्वखर्चाने उपस्थित रहावे लागेल.

**(१३) मुलाखतः-**

(एक) शारीरिक चाचणीच्या निकालाच्या आधारे मुलाखतीसाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांनाच दुय्यम निरीक्षक पदाच्या मुलाखतीसाठी बोलाविण्यात येईल. दुय्यम निरीक्षक पदासाठी मुलाखत ५० गुणांची असेल.

**(१४) अंतिम निकाल-**

लेखी परीक्षा आणि मुलाखतीमध्ये प्राप्त केलेल्या गुणांची एकत्रित बेरीज करुन गुणवत्ताक्रमांनुसार यादी तयार करण्यात येईल. सदर गुणवत्ता यादीमधील समान गुण धारण करणा-या उमेदवारांचा प्राधान्यक्रम (Ranking) शासनाने निश्चित केलेल्या निकषानुसार ठरविण्यात येईल.

******

( शासन निर्णय क्र.इएसटी २७०९/ प्र.क्र.२६५/इएक्ससी-४,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक २७ जुलै, २०१० सोबतचे विवरणपत्र 'ब')

## विवरणपत्र- ब

## दुय्यम निरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा

## परीक्षा स्वरुप व अभ्यासक्रम

१) राज्य उत्पादन शुल्क विभागातील 'दुय्यम निरीक्षक'संवर्गात मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षेने भरावयाच्या रिक्त पदांचा आढावा घेऊन पदसंख्या निश्चित करुन आयुक्त,राज्य उत्पादन शुल्क,मुंबई यांच्याकडुन परिपत्रक निर्गमित करण्यात येईल.परिपत्रकात पुढील बाबींचा समावेश राहील.

अ)पदोन्नतीने भरावयाच्या रिक्त पदांची संख्या (जवान,जवान नि वाहनचालक व लिपिक संवर्गाकरीता उपलब्ध पदसंख्या स्वतंत्रपणे दर्शविण्यात येईल.)

ब)अर्जाचा नमुना,अर्ज करण्याची पध्दत,अर्जासोबत जोडावयाची कागदपत्रे/दाखले,अर्ज मिळण्याचे ठिकाण,अर्जाची किंमत,परीक्षा शुल्क,अर्ज आयुक्तांकडे सादर करण्याची अंतिम तारीख,परीक्षेचा दिनांक,परीक्षेचे केंद्र,वेळ इ.

२) प्राप्त झालेल्या अर्जांची छाननी करुन निवड झालेल्या अर्जदारांना परीक्षेस तात्पुरत्या स्वरुपात प्रवेश दिल्याचे प्रवेशपत्र देण्यात येईल.

३) शारिरीक पात्रता पडताळणीचे ठिकाण,दिवस व वेळ कळविण्यात येईल.

४) अर्जदाराची शारीरिक पात्रता पडताळणी-जिल्हास्तरावर किंवा विभागीय स्तरावर खाली नमूद केलेल्या समितीमार्फत घेण्यात येईल. समितीमध्ये पुढे नमूद केलेल्या अधिकाऱ्यांचा समावेश असेल:-

**१) पुरुष उमेदवार भरतीकरीता:-**

अ- जिल्हा शल्यचिकीत्सक यांनी नामनिर्देशित केलेले वैद्यकीय अधिकारी

ब- जिल्हाधिकारी यांनी नामनिर्देशित केलेले उप-जिल्हाधिकारी

क- जिल्हा अधीक्षक,राउशु यांनी नामनिर्देशित केलेले उपअधीक्षक किंवा ते उपलब्ध नसल्यास निरीक्षक,राउशु

ड- पोलीस अधीक्षक/पोलीस आयुक्त यांनी नामनिर्देशित केलेले पोलीस उपअधीक्षक व उपलब्ध नसल्यास पोलीस निरीक्षक

इ- जिल्हा क्रिडा अधिकारी

**महिला उमेदवारांच्या निवडीसाठी-**

अ- जिल्हा शल्यचिकीत्सक यांनी नामनिर्देशित केलेल्या महिला वैद्यकीय अधिकारी

ब- जिल्हाधिकाऱ्यांनी नामनिर्देशित केलेल्या महिला उपजिल्हाधिकारी व जिल्हाधिकारी कार्यालयात महिला उपजिल्हाधिकारी उपलब्ध नसल्यास विभागीय महसूल आयुक्तांकडून महिला उपजिल्हाधिकारी उपलब्ध करून घेण्याची कार्यवाही करण्यात येईल.

क -जिल्हा अधीक्षक,राउशु यांनी नामनिर्देशित केलेल्या महिला उप अधीक्षक,महिला उप अधीक्षक उपलब्ध नसल्यास महिला निरीक्षक,राउशु,संबंधित जिल्ह्यात उपरोक्त संवर्गातील महिला अधिकारी उपलब्ध नसल्यास विभागातील अन्य जिल्ह्यातील निरीक्षक/महिला उपअधीक्षक किंवा महिला अधीक्षक.ज्या जिल्ह्यात महिला अधीक्षक आहेत त्या जिल्ह्यात महिला उपअधीक्षक/निरीक्षक नसल्यास स्वत: सदस्य म्हणून काम करु शकतील.

ड- पोलीस अधीक्षक/पोलीस आयुक्त यांनी नामनिर्देशित केलेले पोलीस उपअधीक्षक व ते उपलब्ध नसल्यास पोलीस निरीक्षक

इ- जिल्हा क्रिडा अधिकारी

५. शारीरिक पात्रता पडताळणीमध्ये पात्र आढळलेल्या उमेदवारांना मर्यादित स्पर्धा परीक्षेत भाग घेण्याची परवानगी देण्यात येईल.

५.१ परीक्षेचे टप्पे:-दोन -१)लेखी परीक्षा २) मौखिक व व्यक्तिमत्त्व चाचणी

५.२ परीक्षेचे स्वरुप १) लेखी परीक्षा-३०० गुण - लेखी परीक्षा एकूण ३०० गुणांची असेल या परीक्षेसाठी दोन अनिवार्य प्रश्नपत्रिका असतील.त्यापैकी प्रश्नपत्रिका क्र.१ मधील मराठी,इंग्रजी व महाराष्ट्र नागरी सेवा नियम (वर्तणूक व सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) या विभागावर वस्तुनिष्ठ बहुपर्यायी व वर्णनात्मक स्वरुपाचे प्रश्न विचारण्यात येतील व सामान्य ज्ञान या विभागावर वस्तुनिष्ठ स्वरुपाचे प्रश्न विचारण्यात येतील.प्रश्नपत्रिका क्र.२ इंग्रजी व मराठी भाषेतून असेल व ही प्रश्नपत्रिका पारंपारिक स्वरुपाची असेल'

| विषय | दर्जा | वेळ | गुण | माध्यम |
|---|---|---|---|---|
| प्रश्नपत्रिका क्र.१<br>मराठी,इंग्रजी व महाराष्ट्र नागरी सेवा नियम (वर्तणूक व सेवेच्या सर्वसाधारण शर्ती),<br>सामान्यज्ञान<br>मराठी-५० गुण<br>इंग्रजी-३० गुण<br>महाराष्ट्र नागरी सेवा नियम (वर्तणूक व सेवेच्या सर्वसाधारण शर्ती ) -२० गुण.<br>सामान्यज्ञान - १०० गुण | शालांत परीक्षा | तीन तास | २०० | मराठी-मराठी<br>इंग्रजी-इंग्रजी<br>सामान्यज्ञान- इंग्रजी व मराठी |
| प्रश्नपत्रिका क्र.२ | --- | तीन तास | १०० | मराठी/इंग्रजी |

**५.३ परीक्षेचा सविस्तर अभ्यासक्रम:-**

**प्रश्नपत्रिका-१**

मराठी -५० गुण,इंग्रजी-३० गुण व महाराष्ट्र नागरी सेवा नियम (वर्तणूक व सेवेच्या सर्वसाधारण शर्ती)२० गुण :- सर्वसामान्य शब्दसंग्रह,वाक्यरचना,व्याकरण,म्हणी व वाक्प्रचार यांचा अर्थ व उपयोग,तसेच उताऱ्यांवरील प्रश्नांची उत्तरे,निबंधलेखन,कार्यालयीन टिप्पणी व पत्रव्यवहाराची साधी प्रकरणे,शुध्दलेखनाचे नियम व संक्षिप्त लिखाण आणि इंग्रजीतून मराठी व मराठीतून इंग्रजीचे भाषांतर, महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ व महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१.

सामान्य ज्ञान :- १) आधुनिक भारताचा इतिहास

२) भारताचा विशेषत: महाराष्ट्राचा भूगोल

३) भारतीय अर्थव्यवस्था- जागतिकीकराण,उदारीकरण,खाजगीकरण यांच्या विशेष अभ्यासासह

४) घटनादत्त मुलभूत अधिकार व कर्तव्ये (अनुच्छेद १२ ते ३० व ५१-क)

५) राज्य धोरणाची निर्देशक तत्त्वे (संविधानाचे अनुच्छेद ३६ ते ५१)

६) माहितीचा अधिकार अधिनियम २००५

७) ग्राम प्रशासन, जिल्हा प्रशासन,राज्य प्रशासन,केंद्र प्रशासन:- रचना,संघटन,कार्ये,स्थानिक स्वराज्य संस्था.

**८) महाराष्ट्रातील समाजसुधारक व संत**

९) भारतीय व जागतिक चालू घडामोडी

१०) नागरिकशास्त्र

५.३ **प्रश्नपत्रिका २**

**100 Marks - Questions will be asked to test the day to day practical knowledge of the working of the major Acts imlemented by the department and Rules framed thereunder.the major Acts means**

**1) The Bombay Prohibition Act,1949**

**2) The Medicinal & Toilet Preparations (Excise Duties) Act,1956.**

**3) The Narcotic Drugs & Psychotropic Substances Act,1985**

## 4) The Indian Penal Code - 1860

**1. Definitions ( Sec. 6 to 52 )**
**2. Punishments ( Sec. 53 to 75 )**
**3. General Exceptions ( Sec.76 to 106 )**
**4. Abetment ( Sec. 107 to 120 )**
**5. Offences by or Relating to Public Servants. ( Sec.161 to 171 )**
**6. Contempts of the Lawful Authority of Public Servants (Sec.172 to 190)**
**7.False Evidence and offences against Public Justice. Sec.191 to 229 )**
**8.Offences Relating to Weights and Measures.( Sec.264 to 267 )**
**9. Offences affecting Human Body (Sec.299 to 377 )**
**10. Offences against Property Theft ( Sec.378 to 382 )**

## 5) Criminal Procedure Code - 1973

**1.Definition ( Sec.2 )**
**2. Constistution of Criminal Courts and Offices ( Sec.6 to 25 )**
**3. Power of Courts ( Sec.26 to 35 )**
**4. Arrest of Persons ( Sec.41 to 60 )**
**5. Summons Sec.61 to 69 )**
**6. Warrant of Arrest ( Sec.70 to 81)**
**7. Proclamation and Attachment ( Sec.82 to 86 )**
**8. Search Warrant ( Sec.87 to 105 )**
**9. Information to the Police and their powers to Investigate (Sec.154 to176 )**
**10. Trial of Summons cases by Magistrate ( Sec.251 to 265 )**
**11. Provisions as to accused persons of Unsound Mind.( Sec.328 to 339 )**
**12. Provisions as to Bail and Bond ( Sec.436 to 450 )**
**13. Disposal of Property ( Sec.451 to 459 )**
**14. Limitation for taking Cognizance of certain offcences.(Sec.467 to 473 )**

## 6) Indian Evidence Act - 1872

**1. Definitions ( Sec.3 to 4 )**
**2. The Relvency of Facts (Sec.5 to 31 )**
**3. Statements by persons who cannot be called as witnesses (Sec.32 to 55)**
**4. On Proof Sec.56 to 90 )**
**5. The Burden of Proof ( Sec.101 to 114 )**
**6. Estoppel ( Sec.115 to 117 )**
**7. Witnesses ( Sec.118 to 134 )**

**गुन्हा अन्वेषण**

१) गुन्ह्याचा पंचनामा करणे,अटक पंचनामा,जप्ती पंचनामा,आरोपींचे जबाब नोंदविणे,दोषारोप पत्र न्यायालयात दाखल करणे,न्यायालयात आरोपी हजर करणे,जप्त मुद्देमालांचे नमुने प्रयोगशाळांना पाठविणे,जामिन देणे,जप्त मुद्देमालाच्या विल्हेवाटीसाठी न्यायालयाचे आदेश घेणे,समन्स/वॉरंट बजावणे.

२) कार्यालयीन कामकाज पत्र :- टपाल,आवक-जावक,टिप्पणी सादर करणे,कारणे दाखवा नोटीस,अनुज्ञप्ती रद्द करणे/निलंबित करणे,तडजोडीचा दंड आकारणे.

The Bombay Prohibition Act will carry 50 marks & remaining Acts will carry 50 marks.

**५.४ मौखिक व व्यक्तिमत्त्व चाचणी ( ५० गुण)**

मौखिक व व्यक्तिमत्व चाचणी ५० गुणांची असेल.या मौखिक व व्यक्तिमत्त्व चाचणीचा हेतू उमेदवारांची सदर पदावरील नियुक्तीसाठीची योग्यता तपासणी असा असेल.यामध्ये बौध्दिक,सामाजिक, नैतिक गुणवैशिष्ट्यांचा तसेच चिकीत्सक वृत्तीने एखादा विषय ग्रहण करण्याची क्षमता,तर्कसंगत व सुस्पष्ट विचार मांडण्याची क्षमता,समतोल निर्णय घेण्याची क्षमता यांचा समावेश असेल.उमेदवाराला विविध विषयांमध्ये किती रस आहे व त्याने ते विषय सखोलतेने आत्मसात केले आहेत याबरोबरच उमेदवाराला भारतातील व भारताबाहेरील विविध घडामोडींबाबत कितपत आस्था आहे हे सुध्दा जाणून घेण्याचा प्रयत्न प्रस्तुत चाचणीमध्ये केला जाईल.उमेदवारांचा सर्वसामान्य कल,शरीरयष्टी व व्यक्तिमत्व,चाकोरीबाहेरील जीवनाविषयीची आस्था,नेतृत्वगुण याबाबी देखील चाचणीमध्ये विशेष करून पारखण्यात येतील.

५.५ **अंतिम निवड**

अ) अंतिम निकाल तयार करताना प्रत्येक उमेदवाराने लेखी परीक्षा,मौखिक व व्यक्तिमत्त्व चाचणी या दोन्ही चाचण्यांमध्ये प्राप्त केलेल्या गुणांची बेरीज करून सदर परीक्षेस बसलेल्या उमेदवारांचा गुणवत्ताक्रम लावण्यात येईल.उपलब्ध पदसंख्या व राखीव जागा (जवान/लिपिक संवर्ग) तसेच मागासप्रवर्गासाठी आरक्षणाच्या अधीन राहून सदर गुणवत्ताक्रमानुसार उपलब्ध पदसंख्येइतक्या उमेदवारांची नियुक्ती करण्यात येईल.

ब) खरी माहिती लपविणे,खोटी माहिती नमूद करणे,कागदपत्रे,प्रमाणपत्रे यामध्ये अनधिकृतपणे खाडाखोड करणे,आयुक्त,राउशु कार्यालयाकडुन काढण्यात आलेल्या परिपत्रकात नमूद सूचनांचे पालन न करणे, परीक्षा कक्षातील गैरवर्तन,परीक्षेच्या वेळी अनधिकृत कागदपत्रे जवळ बाळगणे,वशिला लावण्याचा प्रयत्न करणे यासारखे कोणतेही गैरप्रकार करणाऱ्या उमेदवारांना गुण कमी करणे,विशिष्ट किंवा सर्व परीक्षांना वा निवडींना अपात्र ठरविणे,काळ्या यादीत समाविष्ट करणे यापैकी प्रकरणपरत्वे योग्य त्या शिक्षा देण्याचे अधिकार विभाग प्रमुखास असतील.

क) पात्र ठरलेल्या प्रत्येक उमेदवाराला संबंधित प्रशिक्षणासाठी प्रवेश अथवा नियुक्ती मिळेलच असे नाही.पात्र उमेदवार सदर प्रशिक्षणासाठी योग्य आहे अशी आयुक्तांची खात्री झाल्याशिवाय तसेच त्यांना या संबंधात आवश्यक तो करार केल्याखेरीज संबधित प्रशिक्षणास पाठविले जाणार नाही.

ड) आयुक्त,राज्य उत्पादन शुल्क,मुंबई हे पात्र असलेल्या उमेदवारांना आवश्यक ते प्रशिक्षणासाठी पाठविण्याचे आदेश काढतील.

इ) संबंधित प्रशिक्षणाची अंतिम परीक्षा उत्तीर्ण होऊन प्रशिक्षण पूर्ण केलेल्या उमेदवारांना आयुक्त,राज्य उत्पादन शुल्क,मुंबई सदरहू विभागीय परीक्षेतील गुणवत्ता क्रमानुसार दुय्यम निरीक्षक या पदावर महाराष्ट्रात कोठेही नियुक्ती देतील.या नियुक्तीस दुय्यम निरीक्षक पदासाठीच्या सेवाप्रवेशनियमानुसार इतर सेवाशर्ती लागू असतील.

------------